**वसंतवर्षा या शास्त्रीय संगीत महोत्सवाच्या आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-८२२३/ प्र. क्र. ३८०/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १ ऑगस्ट, २०२३

**वाचा :** १) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.स/३९६०, दि. ११ मे, २०२३

**प्रस्तावना:-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवाच्या अनुषंगाने विविध कार्यक्रमांचे आयोजन विभागामार्फत करण्यात येत आहे. सदर कार्यक्रमांमध्ये महाराष्ट्राची संस्कृती, परंपरा, लोककला, कलाकृती यांची महती समाजाला तसेच नव्या पिढीला व्हावी व त्यांचा प्रचार - प्रसार व्हावा याद्दष्टीने विभागाकडून विविध सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येते.

त्याच धर्तीवर, दिनांक २ ते ३ जून, २०२३ या कालावधीत शास्त्रीय संगीतावर अधारित “वसंतवर्षा” या सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन घोरपडे नाट्यगृह, इचलकरंजी, कोल्हापूर येथे करण्यात आले होते. सदर सांस्कृतिक कार्यक्रमास व त्यावरील खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक २ ते ३ जून, २०२३ या कालावधीत घोरपडे नाट्यगृह, इचलकरंजी, कोल्हापूर येथे आयोजित करण्यात आलेला “वसंतवर्षा” हा शास्त्रीय संगीतावर आधारित सांस्कृतिक कार्यक्रम व त्यावरील आयोजन खर्च रुपये २३,८८,३२२/- (रुपये तेवीस लाख अठ्ठयाऐंशी हजार तीनशे बावीस फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८०११६१३५११६०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.08.02 14:07:08 +05'30'

**( अनिरूध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४